# अंदमानच्या अंधेरीतून

अंदमानांत ५० वर्षांची सश्रम कारावासाची शिक्षा भोगीत असलेले बंदी विनायक (तात्या) दामोदर सावरकर यांनी आपले धाकटे बंधू नारायण (बाळ) यास पाठविलेली पत्रे.

## पत्र पहिले

।।ॐ।।

।।श्रीराम।।

एकलकोंडी, पोर्टब्लेअर

दिनांक १५-१२-१९१२

प्रियतम बंधू,

१८ महिन्यांनंतर शाईला आणि लेखणीला स्पर्श करावयाची संधी मिळते आहे. या गतीने लिहिण्याची कला कोणालाही लवकरच विसरता येईल! झालेल्या या उशिरामुळे तू फार काळजी करीत असशील. पण प्रियतम बाबांनी तुला जुलैमध्ये पत्र पाठविले होते! तोही मी विचार केला की दोघांकडून एकदम पत्रे येण्यापेक्षा काही अंतराने पत्रे आली तर तू तितका निर्धास्त होशील. तू मेडिकल कॉलेजात गेलास आणि तेथे तुझे चांगले चालले आहे, हे वाचून मला किती आनंद झाला! तुला ते शिक्षण कसे आवडते? माझ्या मताने ते फार उदात्त आहे! आपले विशेष अभ्यासक्षेत्र म्हणून नुसते वैद्यकच नाही तर समग्र प्राणिशास्त्रच तू शिकावेस असे मला वाटते. केवळ धंद्यापुरतेच नाही तर आयुष्यातले एक साध्य या दृष्टीने तू त्याच्यामागे लाग. या शास्त्राच्या योगाने जनसेवेचे आणि लोकोपकाराचे अमर्याद क्षेत्र आपल्याला मोकळे मिळते. त्याला सर्व जगभर मान आहे. हॉटेंटॉटांना जितके ते आदरणीय आहे तितकेच ते आर्यांना पूज्य आहे. शरीराच्या- आत्मा ज्या देवळात राहातो त्या देवघराच्या- अभ्यासाची योग्यता केवळ आत्म्याच्याच अभ्यासाच्या खालोखाल आहे.

तुझी गेल्या वर्षाच्या पुस्तकांची निवड उत्कृष्ट होती. मोरोपंत, भारत, विवेकानंद-सर्व जगन्मान्य पुस्तके. मी मागवलेल्या पुस्तकांपैकी केवळ ज्ञेयमीमांसा आणि अज्ञेयमीमांसा ही आली नाहीत. असे का? या वर्षासाठीही मी तालिका पाठविली आहे; पण माझ्या पुस्तकांसाठी दहा रुपयांपेक्षा अधिक व्यय करू नकोस. आकार वाढत असेल तर खालपासून क्रमाने एक एक वगळीत जा. सर्व पुस्तके नवीनच घेतली पाहिजेत असे नाही. काही जुनी पाठविली तरी चालतील.

बरे, तुला बंगाल कसा काय आवडतो? दुर्गापूजेची सुट्टी संपून तू आता कलकत्त्याला गेला असशील आणि थेट बंगाली बाबू बनला असशील. नाही का? मराठी भाषा विसरलास का? दुसरे तरी काही न विसरायची काळजी घे! कारण मला मोठी भीती वाटते की, त्या चतुर बंगाल्यांपैकी कोणी तुझे हृदय चोरले आहे अशी वार्ता केव्हाही ऐकावयाची मी माझ्या मनाची सिद्धता करून बसावयाला पाहिजे! पण मनातले सांगायचे, मला एखादी बंगाली भावजय मिळाली तर मला तरी फार आवडेल. आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या सध्याच्या स्थितीत युरोपिअन मुलीशी विवाहसंबंध जोडण्याच्या मी जितका पक्का विरुद्ध आहे तितकाच प्रांताप्रांतांतील या लग्नाचा पुरस्कर्ता आहे.

आता बाळ, थोडेसे माझ्यासंबंधी लिहितो. माझी प्रकृती चांगली आहे. या कारागृहात आल्यापासून मोठे असे दुखणे मला कधी झाले नाही आणि मी येथे आलो त्यापेक्षा माझे वजनही मी घटू दिले नाही. शरीराने-मनाने-दोन्ही अंगांनी माझे बरे चालले आहे. लाडक्या, मी अगदी सत्य लिहितो आहे. काही गोष्टींत तर प्रकृती इतकी चांगली आहे की पूर्वी कधी तशी नव्हती! कारण कारागृहातले आयुष्य म्हणजे चांगले व्हावयाची म्हण किंवा वाईट व्हावयाची म्हण अद्‌वितीय संधी आहे. मनुष्य जसा आत येतो तसाच कारागृहाच्या बाहेर कधी पडत नाही. एक तर तो फार सुधारलेला असतो, नाही तर तितकाच अधोगतीला गेलेला असतो. देवमार्गाला लागतो नाही तर राक्षस तरी बनतो. माझ्या सुदैवाने माझे मन या पालटलेल्या परिस्थितीशी लागलीच समरस झाले. इतक्या अस्वस्थ, इतक्या उद्‌योगी - जगभर वावरणाऱ्या - स्वभावाला आठ हात लांबीच्या कोठडीत अगदी घरच्यासारखे स्वस्थ वाटावे म्हणजे आश्चर्य आहे नाही? आयुष्याच्या नित्य पालटत्या परिस्थितीशी आपल्याला जुळवून घेण्याचा - तद्रूप बनावयाचा - हा मानवी मनाचा धर्म ही परमेश्वराने मनुष्य जातीला दिलेली अत्यंत दयामय देणगी आहे!

सकाळच्या पूर्वी आणि संध्याकाळच्या नंतर जेव्हा मी थोडासा प्राणायाम करतो आणि तो करता करताच गोड आणि गाढ झोप लागते - त्या वेळची ती विश्रांती किती स्वस्थ आणि शांत असते! इतकी शांत की सकाळी जेव्हा मला जाग येते तेव्हा किती तरी वेळ मी कारागृहात आहे आणि लाकडी फळ्यांवर पहुडलो आहे याची जाणीव येत नाही! मनुष्याच्या आयुष्यातील सामान्य उद्देश आणि विलोभने दूर दडून बसल्यामुळे सद्‌सद्‌विवेकबुद्धी श्रीरामचंद्रांच्या ध्वजेखाली आपण पाअकी केली आणि तीही काही तरी काम करून केली या जाणिवेने आपल्याशी पूर्ण संतुष्ट असते. आत्म्याच्या भोवती शांत व मधुर समरसता पसरते आणि तो मनाला थोपटीत थोपटीत गाढ

शांतीमध्ये विलीन करतो! याला अपवाद नाहीत असे नाही, पण हा सामान्य नियम आहे. खरोखरच मला वाटते आता जर मुंबईत किंवा लंडनमध्ये एकाएकी मी जाऊन पडलो तर शाकुंतलातल्या ऋषिपुत्राप्रमाणे मीही एकदम ओरडून उठेन - ''जनाकीर्णे मन्ये हुतवहंपरीतं गृहमिव!''

आणि बाळ, लोकांच्या तोंडचे उद्‌गार ऐकून ''तरी पण ते बाहेर असते तर त्यांचे जीवनचरित्र यापेक्षा किती तरी उपयुत्त आणि तेजस्वी झाले असते'' अशा विचारांनी तुझे मन कधी उद्‌विग्न झाले तर हे लक्षात असू दे की ''जे बाहेर काम करतात ते पुष्कळ कार्य करतात; पण जे कारागृहात खपतात ते त्यांच्यापेक्षा अधिक कार्य करतात!'' आणि तसेच म्हटले तर बाळ, तुला असे नाही वाटत की आत्मदान हे कार्यच आहे - आणि ते अधिक सूक्ष्म असल्यामुळे अधिक उत्कट आहे!

सकाळी ५ वाजता घंटा होते तेव्हा मी उठतो. तिचा नाद ऐकताच उच्च प्रतीच्या अभ्यासक्रमासाठी आता आपण वरिष्ठ विद्‌यालयात प्रवेश करतो आहो, असा मला भास होतो. मग १० वाजेपर्यंत आम्ही आमचे नेमलेले श्रमाचे काम करतो. इकडे माझे हात आणि पाय यंत्राप्रमाणे नेमलेले काम करीत असताना तिकडे मन सर्वांचा डोळा चुकवून सकाळचा संचार करावयाला बाहेर पडते आणि सागर महासागर उल्लंघीत आणि दऱ्याखोऱ्यातून भटकत फुलाफुलांतून फिरणाऱ्या भ्रमराप्रमाणे फक्त मधुमय वस्तूंचा आस्वाद घेत ते भ्रमत असते! त्यानंतर मी काही नवीन कविता करतो. मग आमचे जेवण होऊन १२ वाजता पुनः आम्ही कामाला लागतो. ४ वाजल्यानंतर मग विश्रांती, वाचन, इत्यादी. हा माझा येथला नेहमीचा दिनक्रम आहे.

तुझ्या पत्रात आपल्या प्रिय मातृभूमीची काय हालचाल आहे ती लिहावयाला विसरू नकोस. राष्ट्रीय सभेमध्ये एकी आहे का? सन १९१० मध्ये प्रयागला केलेल्या ठरावाप्रमामे दरवर्षी राजकीय बंद्‌यांच्या मुक्ततेचा ठराव राष्ट्रीय सभेत होतो का? टाटांचा लोखंडाचा कारखाना, स्टीम नॅव्हिगेशन कंपनी किंवा नवीन गिरण्या अशासारखा एखादा आणखी स्वदेशी प्रचंड उद्‌योग निघाला का? चीनचे प्रजासत्ताक राज्य कसे चालले आहे? कल्पनेतले रामराज्य प्रत्यक्षात आल्यासारखे हे वाटते नाही? - इतिहासाची ही कादंबरी आहे! चीनचे हे कार्य एका दिवसाचे आहे असे समजू नकोस. थेट १८५० पासून त्यांची ही अविश्रांत धडपड चालली आहे. पण सूर्य कोठे आहे याचा - तो प्रत्यक्ष उगवेपर्यंत - जगाला ठाव नसतो! इराण, पोर्तुगाल, मिसर यांचे कसे चालले आहे? तसेच दक्षिण आफ्रिकेतल्या हिंदी बांधवांना त्यांच्या मागण्यांच्या प्रकरणात काही यश आले का? नवीन विधिमंडळाने गोखल्यांच्या शिक्षणविषयक ठरावासारखा एखादा महत्त्वाचा निर्बंध केला असल्यास अवश्य कळव. त्या महनीय विभूतीची - लोकमान्य टिळकांची- मुक्तता केव्हा होणार?

तू माझे पत्र प्रिय यमुनेला दाखविलेस का? तिला त्याचे समग्र भाषांतर करून सांग. आणखी थोडी वर्षे- फार तर पाच- म्हणजे पुनः सुप्रभात होईल! तेव्हा प्रियतम, आतापर्यंत धीरोदात्ततेने जसे दिवस काढलेस तसे आणखी हे काढ. माझ्या प्रियतम वहिनींना माझे अत्यंत पूज्य प्रणाम. यापूर्वी आणि आताही आपल्या आशीर्वादमय प्रेमाने ती एकदमच मला माता, भगिनी आणि सखी यांच्या स्थानी होती आणि आहे. आणखी इतर मंडळी - त्यांच्या स्मरणाने माझे हृदय भरून येते आहे, पण त्यांचे नाव लिहिता येत नाही!- त्यांना सांग त्यांच्यापैकी प्रत्येकाच्या-त्या सर्वांच्या-मला आठवणी येतात! मी त्यांना विसरणे कसे शक्य आहे? नाही. बद्ध झालेल्या व्यक्तीला विसरणे शक्य नाही. नवीन विषय बंद झाल्यामुळे जुन्या विषयांचेच मनास चर्वण करावे लागते, आणि म्हणून कारागृहात जुन्या ओळखी विस्मृत न होता त्या अधिक दृढ होतात; इतकेच नाही तर पूर्वी स्मृतिपटावरून नाहीशा झालेल्या व्यक्तींच्या विषयी प्रेम वाटू लागते! माझ्या जिवलग मित्रांनो कारागृहात आसवांवर आसवे गाळली तरी कोणी येऊन ते अश्रू पुशील-एक प्रेमाचा, मायेचा शब्द बोलणाऱ्याची वाटच पाहत बसावे लागते! येथे मी कोणालाही विसरणे कसे शक्य आहे? माझे आवडते सखे, सहकारी, प्राणांहून प्रिय, ते सर्व तुला ठाऊक आहेत. त्यांना मी अत्यंत प्रेमाने त्यांची आठवण केली म्हणून सांग. आणि ज्या वेळी रक्ताचा संबंध सुद्धा नाकरावयाला काहींना लाज वाटली नाही त्या वेळीही जे तुझ्या पाठीशी उभे राहिले आणि ज्यांना माझी आठवण येते त्यांना मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे म्हणून कळव. कारागृहातून आलेले पत्र म्हणून न्यूनाधिक प्रमाणात ठराविक साच्यातच आले पाहिजे हे ते जाणतातच आहेत-तेव्हा नावे घेत नाही. प्रिय माईला माझे आशीर्वाद आणि तिच्या लहानग्या वसंताला माझ्या शुभाशा अर्पण कर. तसेच प्रिय मामींना आणि चि. चंपूलाही नमस्कार आणि आशीर्वाद सांग.

तुझा प्रिय भाऊ

तात्या.

पत्र दुसरे

।।ॐ।।

।।श्रीराम।।

एकलकोंडी, पोर्टब्लेअर

दिनांक १५-२-१९१४

माझ्या लाडक्या बाळा,

आता ये असा- एक वर्ष सरून गेले आणि आनंदाचा दिवस पुनः उगवला आहे! घरून पत्र यावयाचे- घरी पत्र लिहावयाचे- म्हणजे त्यात किती ब्रह्मानंद साठवला असतो याची पूर्ण कल्पना जे कारागृहात कधी गेले नाहीत त्यांना केव्हाही व्हावयाची नाही!! गोड-समुद्राच्या वाळवंटावर, चांदण्याच्या प्रकाशात, आपल्या प्रेमाच्या जिवाभावाच्या माणसाशी केलेल्या आलापातल्या माधुर्यासारखा मधुमय- पण थांब, घंटा झाली, मला जेवायला गेले पाहिजे. हे दहा वाजले!- हं; कारावासीयांच्या सार्वजनिक भोजनालयातून जेवण आटोपून मी आता परत आलो आहे.- मी काय लिहीत होतो? हो, हा पत्रलेखनाचा प्रसंग अत्यंत गोड वाटतो. घरी पत्र लिहावयाचा दिवस हाच आमचा खरा पाडवा, वर्षप्रतिपदेचा दिवस असतो! मी माझ्या वर्षगणनेचा प्रारंभ या दिवसापासून करतो! कारण आज माझ्या आवडीच्या आत्मीयांशी झालेल्या एकतानतेने येणाऱ्या उत्साहामुळे आणि सामर्थ्यामुळे मला पुढे एक वर्षभर श्वासोच्छ्वास करता येतो, जगता येते, हसता खेळता येते! याच्या आधी पत्र लिहिले नाही आणि त्यामुळे तुला तार करावी लागली याविषयी मला वाईट वाटते. येथल्या अधिकाऱ्यांनी कृपा करून मला ही गोष्ट कळवली. पण बाळ, वर्ष झाले आणि पत्र पाठवावयाचा अधिकार प्राप्त झाला तरी आमची येथली कल्पापूर्वीची डाकविभाग व्यवस्था अशी आहे की, येथून ५-६ आठवडे आणखी गेल्याविना कलकत्त्याला पत्रच जात नाही असे मी ऐकतो. यामुळे तसे १४ महिने होईपर्यंत पत्र धाडता येत नाही! पण तू पाठविलेले कोणतेही पत्र या विसाव्या शतकातल्या पूर्ण त्वरेने येथे येऊन पोचते. तुझ्या पत्रावरून तुझी प्रकृती चांगली आहे आणि तू उत्कृष्ट रीतीने परीक्षेत उत्तीर्ण झालास हे वाचून मला फार आनंद वाटला. परीक्षा साधो वा न साधो प्रकृतीची अगदी हेळसांड होता कामा नये. अहं! तुला धडधाकट, आरोग्य-प्रफुल्लता-उत्साह आतून उसळी मारीत आहेत असे, पाहावे असे वाटते! तुझ्यात आता उमलू लागलेले नवतारुण्य हे चैतन्याचा आणि उत्साहाचा मूळ झरा आहे. कोणत्याही एका अवयवाला इतरांपेक्षा अधिक ताण पडून तो क्षीण होता कामा नये. शरीराने आणि मेंदूने, दोन्ही अंगांनी, सारखाच वाढत जा. तू स्वतःच डॉक्टर आहेस तेव्हा आमच्यासारख्या अतज्ज्ञ माणसांनी तुझ्याशी आरोग्याविषयी

बोलावयाचे म्हणजे धारिष्ट्य आहे! पण, यौवन आंधळे असते! उत्साहशक्तीचा झरा आतून वाहत असतो आणि हे शरीर वाढीला लागलेले असते तेव्हाच चैतन्य आणि उत्साह याचा भरपूर साठा संग्रही टाकावा म्हणजे आयुष्याच्या हिवाळ्यात योगक्षेम चालवावयाला त्याचा उपयोग होईल ही गोष्ट ते विसरते! तुझी दृष्टी अधू झालेली आढळली. लव्हाळ्यासारखी तुझी शरीरयष्टी लिवलिवीत दिसू लागली तर मी एकदम ओरडेन, ''वैद्यमहाराज, आधी स्वतःचे आरोग्य सुधारा!'' (गालातल्या गालात हसू नकोस लबाडा - मी काही वैद्य नाही. तेव्हा आम्ही आपली दृष्टी बिघडवू शकतो!) माझी लाडकी कोकरे बी.ए. आणि एम्.ए. ची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाली हे वाचून मला किती अभिमान वाटला! हे कौतुकास्पद झाले. पण आता त्यांच्यापुढे पसरलेल्या कर्तव्याच्या रणक्षेत्रात असेच झुंजून त्यांनी असेच जिंकले आणि तेथेही तेथली सुवर्णपदके प्रदान करावयाला योग्य म्हणून त्यांची निवड झाली तर ते अधिक उदात्त होईल! कारण मानव्याच्या विश्वसंस्थेच्या त्या सुवर्णपदकांसमोर ही तुमच्या विश्वविद्यालयाची सुवर्णपदके म्हणजे कथलाचे तुकडे आहेत. त्यांच्या हातची पत्रे वाचावयास मिळाली तर मला फार आनंद वाटेल. कारण अद्याप पर्यंत त्यांच्यापैकी काहींची आठवण स्मरणातून जातच नाही. आपण होऊन जे तुला तसे कळवतील त्यांच्याविषयी नावाने आणि निर्देश करून मला लिही.

तू पाठविलेली पुस्तके अगदी अप्रतिम आहेत. 'महात्मा परिचय'- भाषांतर किती सुंदर आहे! आणि ती दोनच ओळींची प्रस्तावना किती विनयशील आणि किती समर्पक- ''फोडिले भांडार, धन्याचा हा माल, मी तवं हमाल, भार वाही!!'' मला ते फारच आवडले आणि 'जाईचा मंडप'- दहा-बारा पानांपर्यंत मी गेलो नाही तोच आतल्या प्रत्येक शब्दाबरोबर माझ्या हृदयातून संवादी सूर निघू लागले आणि ते कोणी लिहिले असावे याची मला जाणीव झाली! योजिलेली भाषा आतील भावनांना साजेशी आहे. प्रदर्शित केलेल्या काव्यमय आणि उदात्त भावना संविधानकाला शोभतील अशाच आहेत आणि संविधानक दोहोंच्याही योग्यतेचे आहे. भारतगौरव-ग्रंथमालेसारख्या लोकप्रिय मालांनी लोकांच्या अभिरुचीप्रमाणे आपण न वाहवता तिला चांगले वळण देण्याचे आपले कर्तव्य ओळखून मधूनमधून राजकीय इतिहास, विज्ञान, अर्थशास्त्र, मिलची 'प्रातिनिधिक राजसत्ता' अशा प्रकारची पुस्तके प्रसिद्ध करणे अवश्य आहे. वेदांत तत्त्वज्ञानावरच्या पुस्तकांसंबंधी सांगावयाचे म्हणजे आपल्या लोकांनी असल्या गोष्टीत लक्ष घालणे या काळी अनुचित आहे. अमेरिकेला वेदांत तत्त्वज्ञानाची आवश्यकता आहे; इंग्लंडातही तशीच आहे. कारण त्यांनी आपला जीवनक्रम परिणत, ऐश्वर्यसंपन्न आणि पौरुषपूर्ण केला आहे. त्यांचे क्षत्रियत्व संपादून झाले आहे आणि ज्या अवस्थेत गेले तरच ते तत्त्वज्ञान समजावयाचे आणि अनुभवावयाचे सामर्थ्य येते त्या ब्राह्मण्याच्या सीमारेषेपर्यंत ते गेले आहेत. हिंदुस्थानचे तसे नाही. आपण सर्व आज शूद्रावस्थेत आहोत आणि वेद किंवा वेदांत यांना स्पर्श करावयाचा आपल्याला अधिकार नाही.

शूद्रांना वेदपठनाला अनधिकारी गणावयाच्या मुळाशी ही कल्पना आहे. हा निषेध निष्ठुरपणाने किंवा संकुचित स्वार्थबुद्धीने घातलेला नाही. तसे असते तर त्याच ब्राह्मणांनी ज्यांच्यात त्याच तत्त्वज्ञानाचे अत्यंत सौकर्याने विवरण केलेले आहे ते पुराणग्रंथ त्यांच्यासाठी लिहिले नसते! आपण राष्ट्र या दृष्टीने त्या उदात्त कल्पनांना अयोग्य आहोत. दुसरे बाजीराव पंतप्रधान मोठे वेदांती होते हे प्रसिद्ध आहे; पण कदाचित म्हणूनच त्यांना स्वतःचे राज्य आणि परक्याचे सेवांत-वेतन यांच्यातले अंतर दिसले नाही! आपण इतिहास, राजकारण, विज्ञान, अर्थशास्त्र यांचा अभ्यास केला पाहिजे; या जगात मानाने जगावयास शिकले पाहिजे; गृहस्थाचे सर्व कर्तव्य बजावून गृहस्थाश्रम सांग पार पाडला पाहिजे; - मग वानप्रस्थाश्रम आणि त्या आश्रमातील वेदांताचा उषःकाल येईल. तोपर्यंत या गोष्टींचा कोणताही उपयोग असो त्या विधवांकडे, म्हाताऱ्या -कोताऱ्याकडे, कामावरून निघालेल्या सेवानिवृत्तांकडे सोपवल्या पाहिजेत! त्यांच्यासाठी भूतकाळ नि त्यांची ती जुनी पुस्तके आणि परुष, आत्मा आणि परमेश्वर यांची पुराणी कोडी आहेत! तरुणांनी - अभिनवांनी - भविष्यकाळात का संचार करू नये? म्हणे वेदांत! - वाराणशीने एकही हुतात्मा जगाला दिला नाही आणि आपल्या पितृदेशासाठी एक पैही द्यावयाची तिची योग्यता नाही.

आता आमच्या येथील स्थितीसंबंधाने थोडेसे लिहितो-गेल्या वर्षातही मला कोणते दुखणे आले नाही. माझी प्रकृती उत्कृष्ट आहे आणि माझे वजन अद्यापि पूर्वीइतकेच आहे. मोठा अचाट पराक्रम आहे नाही? या माझ्या चिमुकल्या विवरात्मक आरोग्यभुवनात मी लवकर उठतो, नियमित अन्न नियमित वेळी खातो आणि लवकर झोपी जातो- म्हणजे आम्हाला या गोष्टी कराव्याच लागतात-आणि म्हणून लवकर निजून लवकर उठणाऱ्या मला-ज्ञानसंपत्ती विरहित का असेना पण- आरोग्य भेटते! तुम्हाला सांगावयाचेच म्हणजे अहो भावी डॉक्टर महाशय, आपल्या रोग्यांसाठी येथल्यापेक्षा अधिक चांगले वेळापत्रक आपल्याला काही सुचले नसते! आणिमाझ्या शरीराची प्रकृती जशी उत्कृष्ट आहे तशी माझ्या मनाची प्रकृती त्याहूनही उत्कृष्ट आहे!

कोणत्याही कठीण किंवा सोप्या कामाकडे माझी योजना होवो मी ते ‘स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः’, किंवा ‘यतः प्रवृत्तीर्भूतानां येन सर्वमिदं ततम्। स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवाः।’ अथवा ‘सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः’ हे चरण स्वतःशी गुणगुणत पार पाडीत असतो आणि प्रती संध्याकाळी- हो, आताशा मला मिळालेल्या कोठडीतून आकाशाचा किंचित भाग दिसतो- ती सूर्यास्ताची शोभा आणि प्रकाश नि छायेचा तो थाटमाट मी निरीक्षण करू लागलो की पाहता पाहता माझे मन गुलाबकलिका, कमलकंद आणि कल्हारकासार यांच्याजवळ पटकन जाते! कधी हे विचार चालतात, कधी ते विचार चालतात; कवीच्या समवेत ‘एकतस्तटतमालमालिनीम्! पश्य धातुरसनिम्नगामिव’ किंवा ‘तेन मानिनि ममात्रगौरवम्!’ असल्या विचारात केव्हा मन रमते, तर केव्हा वेदांत- तत्त्वज्ञान्यांच्या सहवासात

''जे काही दिसते त्याला प्रत्यक्ष अस्तित्व नाही-निदान आपल्याला तरी ठाऊक नाही- ते आपल्याच कल्पनेचे विकार आहेत'' असल्या गूढ विचारात भ्रमण करते आणि माझे मन पूर्ण सुखात असते- स्नेहमयांच्या सहवासात तेथे असताना जितके असे अगदी तितके- प्रेममयींच्या सहवासात तेथे असताना जितके असे तितके- सुखात असते! मधूनमधून कधी हट्टी मुलाप्रमाणे त्याचे डोके बिघडले आणि ते हटून रडू लागले की विवेकरूपी आजीबाई लागलीच अवतीर्ण होतात आणि हसत सांत्वन करतात ''काय होते माझ्या बाळाला? दुसऱ्याला कळूही न देता तू किती वेदना सहन करतो आहेस? वेडा कुठला!'' महत्त्वाकांक्षेच्या शिखरावर आपण स्वतः आरूढ व्हावे, आत्मवैभवाच्या रथात परिभ्रमण करावे, असे का तुला वाटत होते? तसे असेल तर असल्या स्वार्थी, अधोगामी महत्त्वाकांक्षेच्या मार्गात व्यत्यय आला, तुला अपयश आले हे योग्यच झाले! पण परमेश्वराला आणि मलाही ठाऊक आहे की स्वतःला कोणतेही पारितोषिक मिळावे हा लोभ तुला शिवला नाही!- कीर्ती, नाव, भूमी, द्रव्य, निदान पक्षीसुख,- कशाचीही तू इच्छा केली नाहीस! या दिव्यात सर्वांच्यापेक्षा अधिक कष्ट सोसण्याचा मान आपला असला पाहिजे एवढाच तुझा हेतू! निदान माझ्यापाशी तू असे म्हणत होतास, ''दुसऱ्यासाठी, मनुष्यजातीसाठी, अधिकात अधिक आत्मयज्ञ करावयाचा''.- मग सांग बघू, ''येथे निराशेचा काय संबंध येतो? तू ज्यात सर्वस्वाची दक्षिणा दिलेली आहे असा सर्वस्वदक्षिणा यज्ञ संपादन केलेला आहेस! ज्यांना अंत नाही, ज्यांना कालमर्यादा नाही, असे क्लेश तू सोसतो आहेस! आत्मक्लेशाने आपला अभागी वंश पावन करावयाच्या महत्कृत्याला वाहिलेला नाही असा तुझा एकही क्षण जात नाही- असे तुझे एकही कृत्य असत नाही, तर मग आनंदी हो! यापेक्षा तुला अधिक ते काय करता आले असते?'' आणि लागलीच मन आपला पिसारा उभारून भरारी मारते आणि वर जाऊन पुनः एकदा गाऊ लागते. कदाचित एखादे वेळा असे न होता आपल्या अहंतेचाच विचार मन करू लागले तर त्या आजीबाई त्याला फिरायला घेऊन जाऊन जगाचे विश्वरूप दाखवितात आणि म्हणतात, ''तो पाहा नगाधिराज हिमालय! त्याचेही मुळीच अस्तित्व नव्हते असा एक काळ होता आणि असा एक काळ येईल की त्याचा मागमूसही राहणार नाही आणि हा चंद्र पहा, ही विशाल सूर्यमाला अवलोकन कर आणि हे अनंत नक्षत्र मंडळही दृष्टीखाली घाल!'' त्या चिमुकल्या मनाला याहून अधिक सहन करणे अशक्य होते, ते स्वतःला विसरते आणि आपण मिरवलेल्या प्रतिष्ठेची आणि केलेल्या सोपस्काराची लाज वाटून या विश्वात विलीन होते.

तेव्हा बाळ! येथे आम्ही दोघेही मनाने व शरीराने पूर्णपणे स्वास्थ्यात आहोत. आमच्याविषयी यत्किंचित काळजी करू नकोस. आम्हांला या जगाशी बद्ध करते आहे अशी वाटणारी एकच गोष्ट म्हणजे तुझे आरोग्य आणि सुरक्षितता. या दोहोंचा जर तू निर्वाळा देत असशील- अर्थातच तू आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केलास म्हणजे झाले; फलाची काळजी आम्ही करीत नाही- तर आमच्यासारखे सुखी कोणी नाही. अद्याप कारावासाने आमच्यावर

कोणता वाईट परिणाम केलेला नाही की कोणतीही हीन छाया पाडली नाही. आणि हा सर्व प्रकृतीचा निकोपपणा परिस्थितीचे साहाय्य मिळून नाही तर परिस्थितीशी झगडून आम्ही राखला आहे. असो. अधिकाऱ्यांकडे अर्ज पाठवून भेटीची वेळ इत्यादीं विषयी विचारणा केल्याचे तू लिहिलेस. वास्तविक येथल्या वहिवाटीप्रमाणे मला कारागृहातून मुक्त करून बेटावर राहावयाची केव्हाच अनुमती मिळावयाला पाहिजे होती. माझे 'वर्तन' त्यांच्याच लेखाप्रमाणे उत्कृष्ट आहे. तरी पण आमच्यापैकी कोणालाही बाहेर सोडले नाही! याचा पुन्हा विचार व्हावा म्हणून मी सरकारकडे लिहिणारच आहे. आणि तुलाही जेव्हा काही विचारणा करावयाची असेल तेव्हा तूही येथील अधिकाऱ्यांस लिहित जा. लवकरच ती. स्व. बाबांची पाच वर्षे पुरी होतील आणि मग तुला अधिकाराने भेट मागता येईल. इतर बंद्यांच्या संबंधात तेथल्या अधिकाऱ्यांना जरी सर्व अधिकार आहे तरी आमच्या संबंधात आम्हाला बाहेर सोडावयाचे किंवा घरच्या मंडळींना येथे आणावयाला अनुमती द्यावयाची यांपैकी त्यांच्या हातून काही होईल असे वाटत नाही. त्यांना त्याविषयी फारसा दोषही देता येत नाही. कारण आमच्या संबंधात प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारकडून आज्ञा सुटतात असे वाटते. तेव्हा येथल्या अधिकाऱ्यांकडून काही चौकशी लागली नाही तर तू परभारे हिंदुस्थान सरकारकडे पत्रव्यवहार करीत जा. मुख्य सांगावयाचे म्हणजे, हे कसेही असो आमच्या व्यवस्थेसबंधी तू मनाला त्रास करून घेत जाऊ नकोस. न्यायतः जे करणे प्राप्त आहे ते बहुधा सरकार स्वतःच करील आणि आम्ही त्यांना नेहमी टोचणी लावायला आहोच. आम्हाला दुसरे कामच कोणते आहे? तू स्वतःच्या प्रकृतीची आणि सुरक्षिततेची अत्यंत काळजी घे म्हणजे झाले. मी हायकोर्टात काय सांगितले त्याची आठवण असू दे.

माझ्या लाडक्या यमुनेला सांग की हे ४ वर्षे पूर्ण व्हावयाच्या आधीच आनंदाच्या दिवसाची प्रभात दिसल्यावाचून राहणार नाही. तेव्हा तिने आणि आपल्या परमप्रिय वहिनींनी आणखी काही दिवस- आजपर्यंत धरला त्याप्रमाणे आणखी काही दिवस- धीर धरावा. त्यांनी सर्व मराठी वाङ्मय वाचून काढावे. नुसती जुनी पुराणेच नाहीत तर पूर्व आणि पश्चिम यांच्या जीवनप्रवाहाचा नवीन वाहता, जिवंत झरा ज्यात उमटला आहे असे सर्व वाङ्मय वाचून काढावे. माझा उदारचरित्र सहकारी आणि सखा सखाराम याच्या उदात्त मरणाचा वृत्तांत ऐकून माझे मन उदास अभिमानाने भरून गेले! तुला ठाऊकच आहे, इंग्रजी शाळेमध्ये असताना त्याची व माझी पहिल्याने गाठ पडली. तो शूरासारखा जगला- शूरासारखा मेला! आणखी अभीष्ट ते कोणाचेही काय असणार! त्याची पत्नी जानकीबाई- मी तिला पाहिलेले नाही-पण तुमच्या लेखणीतून उतरलेल्या तिच्या चित्राने ती माझ्या डोळ्यासमोर दिसते. ती दीन नाही, ती दुर्दैवी नाही!- आयुष्यातली अत्यंत महनीय भूमिका करावयाचे काम तिला दिले गेले आहे. माझा तिला नमस्कार सांग. चिमुकला वसंत कसा काय आहे? हे छोटे सरकार आम्हाला आपल्या हातचा एखादा शब्द लिहितील का? तो आता ७ वर्षांचा झाला असेल नाही? आणि त्याची आई - तिची माझी शेवटची भेट डोंगरीच्या कारागृहात झाली!

बहीण ही मनुष्याला मिळणारी अत्यंत थोर देणगी आहे. तिला माझे प्रेमाशीर्वाद दे आणि तिच्या त्या बालवीराचा - माझ्या वसंताचा - माझ्यासाठी एक मुका घे. आपल्या सर्व आप्तांना माझे नमस्कार म्हणून सांग-कोणाला न वगळता अगदी सगळ्यांना-विशेषतः तिला-जिला मी विनोदाने आपल्या संस्थेची माता म्हणत होतो, आणि जिला अत्यंत कृतज्ञतेने अंतःकरणापासून मी आता माझी आई म्हणतो, जी तुझ्या एकसारखी पाठीशी आहे आणि माझी नेहमी आठवण ठेवते तिला-तिचे आपले नाते नसले तरी, किंबहुना नाही एवढ्यासाठीच - तसेच ज्यांची नावे न उच्चारणे म्हणजे पाप करणे आहे असे वाटते आणि तरीही जिथे केवळ पायच नाहीत तर जीभही शृंखलाबद्ध असते अशा कारागृहातून त्यांच्याच साठी ज्यांच्या नावाचा उच्चार करता येत नाही त्या सर्वांना - मी प्रेमाने विचारले आहे म्हणून सांग. तसेच त्यांना-तुला ते सगळे माहिती आहेत, माझे जिवलग मित्र म्हणून माझ्या हृदयाच्या अत्यंत जवळ कोण होते त्यांची नावे मी तुला सांगितली आहेत- त्यांना  माझे प्रेम, अगदी नवीन टवटवीत प्रेम-अर्पण कर. त्यांच्यातून कोणी आपण होऊन पत्रात स्वतःचा उल्लेख करावयाला तुला सांगितला तर मग मी माझे हृदय उघडे करीन आणि त्यांचा नामोच्चार करीन. मला आता कोणती पुस्तके पाठवावयाची त्यांची नामावली पुढे देतो आहे. वेळ संपली. तेव्हा आता माझ्या लाडक्या बाळा, अत्यंत अनिच्छेने तुझ्यापासून दूर व्हावे लागते आहे.

तुझा भाऊ

तात्या.

पत्र तिसरे

।।ॐ।।

।।श्रीराम।।

एकलकोंडी, पोर्ट ब्लेअर

दिनांक ९-३-१९१५

प्रियतम बाळ-

पुनः एकदा कुंभकर्णाची निद्रा संपवून माझी लेखणी जागी झाली आहे. आणि ७/८ महिन्यांपूर्वी तू पाठविलेले पत्र मिळाले हे कळवण्याकरिता ती धाव घेते आहे! तुझे पत्र येणे म्हणजे तुझी भेट होणे आहे. कारण एक तर तुझी पत्रे चलत्चित्रपटातल्या प्रमाणे देखाव्यांनी भरलेली असतात. आणि दुसरे कारागृहातील एकांतवास माणसाच्या श्रवणेंद्रियाला अशी अद्भुत शक्ती देतो की तिच्या योगाने जन्मान्धा प्रमाणे ऐकलेल्या गोष्टी मनश्चक्षूंसमोर उभ्या राहतात! तुझे पत्र आले की प्रत्यक्ष तू आणि तुझ्या भोवती आपल्या कलनिनादिनी गोदावरी तीरावरील चिमुकल्या सुखकर आवासातील प्रेमाची दृष्ये आणि आवडीची मुखकमले मला मूर्तिमंत नेत्रांपुढे उभी करता येतात. मला आणि ती.बाबांना तुझे चांगले चालले आहे हे ऐकून आनंद वाटला आणि जोपर्यंत तू आपल्या प्रकृतीची काळजी घेत आहेस आणि उदात्त स्वास्थ्याचे आणि आरोग्यपूर्ण असे आयुष्य घालविण्याचा शक्य तितका प्रयत्न करतो आहेस तोपर्यंत आमच्या प्रकृतीची, मानसिक आणि शारीरिक दोन्हीही, तुला काळजी करावयाचे काही कारण नाही. मागच्या वर्षाची तू पाठविलेली पुस्तके १६ होती आणि या वर्षी १३ होती (४ इंग्रजी, इतर संस्कृत आणि मराठी) हे बरोबर आहे का ते उत्तरात लिही. पुढच्या खेपेला तू पुस्तके पाठवशील त्या वेळी तुझ्या हातची नामावली समवेत पाठवावयाला विसरू नकोस म्हणजे आम्हाला ताडून पाहावयाला बरे पडेल. 'समाज रहस्य' वाचून आनंद झाला. त्याच्या दोन प्रती कशाला पाठविल्यास? फार चांगली कादंबरी आहे. एक सूचना कराविशी वाटते. आपल्या सामाजिक चालीरीतींत ही जातिभेदाची पद्धती म्हणजे हिंदुस्थानला मिळालेला महाशाप आहे. तिच्यामुळे हिंदू-जीवनाचा प्रबळ प्रवाह वाळवंटात आणि डबक्यात मुरू पाहतो आहे. ''पहिल्याने आम्ही त्यांच्या चार जाती बनवू'' इत्यादी उद्गारात काही अर्थ नाही. तसे व्हावयाचे नाही आणि होऊही नये. शेंड्या-बुडख्यासकट त्यांचे उच्चाटन केले पाहिजे. हे साधावयाचा उत्तम मार्ग म्हणजे सर्व प्रकारच्या वाङ्मयातून - आणि मुख्यतः नाटक व कादंबऱ्या यांच्यातून - त्यांच्यावर शस्त्र धरावयाचे. प्रत्येक खऱ्या देशभक्ताने दुटप्पी वागणे सोडून देऊन

आपल्याला या प्रश्नावर वाटते ते स्पष्ट बोलून दाखवावे आणि त्याप्रमाणे आचरण करावे. यात मात्र एक काळजी घेतली पाहिजे. आपला इतर राष्ट्रांशी आलेला संबंध हा आजचा मुख्य प्रश्न आहे. तो योग्य प्रकाराने वाटेला लागल्यावाचून कोणतेही आतले प्रश्न समाधानकारक किंवा खरोखर उपयोग होईल अतपत सोडवणे शक्य नाही. तेव्हा ते करीत असताना मुख्य प्रश्नाकडे दुर्लक्ष होईल किंवा तो सोडविण्यात अडथळे किंवा अडचणी येतील अशा रीतीने अंतर्गत प्रश्नात गढून जाता कामा नये किंवा या आपसातल्या संबंधाच्या उपप्रश्नांचे स्तोम माजविता कामा नये. तेव्हा समाजरहस्यासारख्या या अन्याय्य आणि दुर्बल करणाऱ्या सामाजिक दोषांवर मारा चढवणाऱ्या सुंदर कादंबऱ्या जितक्या अधिक लिहिल्या जातील तितक्या मला पाहिजे आहेत. जातिभेदाने भूतकाळात पुष्कळ कार्य केले असेल पण आता त्यात चैतन्य राहिलेले नाही. तेव्हा त्याला आता आपण मूठमाती देणे- पाहिजे असेल तर वर अश्रूंचे उदक सोडून- हेच योग्य आहे! आमच्या भेटीची तुला या वर्षी अनुमती मिळणार आहे हे वाचून मला फार आनंद वाटला. त्याविषयी आभार मानणे योग्य आहे. पण ती. वहिनींनी या वेळी तरी या प्रवासाचा त्रास घेऊ नये असे माझे निश्चित मत आहे. तू एकटाच ये आणि मार्गातल्या सर्व सोयी किंवा अडचणी तू प्रत्यक्ष पाहिल्यानंतर आणि त्यांना आणावयाचा सर्वांत चांगला मार्ग कोणता हे समजल्यावर पुढच्या खेपेला तू आम्हाला भेटावयाला येशील तेव्हा वहिनींना आणि माईला घेऊन ये. त्यांच्याच सोयीसाठी या वर्षी त्या माझ्या आवडत्या माणसांच्या भेटीचे निरुपम सुख सोडावयाला सिद्ध होणे हे मला माझे कर्तव्य वाटते. तेव्हा या वर्षी एकटाच ये.

जगातील सर्वश्रेष्ठ सैनिक सत्तेशी युद्ध करण्यासाठी हजारो हिंदी सैनिकांना युरोपच्या रणभूमीवर जावयाची संधी मिळाली; तेथे त्यांनी आपली कामे उत्कृष्ट बजाविली आणि लढवय्ये म्हणून कीर्ती गाजविली, हे ऐकून मला आनंदाचे भरते आले. देवाची कृपा! हिंदुस्थानातून एकंदरीत अद्यापि पौरुष मृतप्राय झाले नाही तर! किती सुंदर झाले! आपल्या लोकांना परदेशात प्रवास करावयाला प्रोत्साहन द्यावे लागे आणि एखाद्या वर्षी १२ माणसे परदेशात पाठवावयाला मिळाली तर स्वतःचे अभिनंदन करावयाची पाळी येई! आणि आता आपल्याला जे करता येत नव्हते ते दैवाने घडवून आणले! शेकडो हिंदू-रजपूत आणि गुरख्यांप्रमाणे पुराणमताभिमानी किंवा शीखांप्रमाणे सुधारलेल्या पंथाचे हजारो हिंदू - समुद्रपर्यटणाला गेले आणि तेही सरकारी पुरस्काराखाली. आता आपल्या पंडितांना हिंदूंना समुद्रपर्यटण निषिद्ध आहे किंवा नाही याच्या शास्त्रार्थाची अंडी उबवीत सुखेनैव बसू द्या. संमत किंवा निषिद्ध कसेही असले तरी हिंदू आता समुद्र ओलांडून गेले आणि समुद्रासमवेतच त्यांनी पुराण युगही ओलांडले आहे. आशियातील वरच्या प्रतीच्या संस्कृतीशी संबंध आणून युरोपच्या संबंधात ख्रिस्त्यांच्या धर्मयुद्धांनी जे कार्य केले तेच कार्य हिंदी सैनिकांनी युरोपियनांशी केलेल्या झगड्यांनी हिंदुस्थानच्या आणि आशियाच्या संबंधात साधणार आहे.

राजकीय बंद्यांच्या मुक्ततेसाठी पंजाबातून जो अर्ज झाला आहे त्याविषयी लिहावयाचे म्हणजे त्यांच्या या उदार कृत्यासाठी आम्ही त्यांचे कितीही आभार मानले तरी ते अपुरेच पडणार. आमच्यापैकी काही जणांनी रणभूमीवर स्वयंसेवक म्हणून जाण्याची आपली सिद्धता कळवली आहे हे तुला कळलेच असेल. त्याचे अद्यापि काही उत्तर आले नाही, पण सरकारने या गोष्टीची विशेष नोंद केल्याचे समजते.

पार्लमेंटातील कोणी सभासदाने माझ्याविषयी किंवा आपल्यापैकी काही जणांविषयी युद्धाला प्रारंभ होण्यापूर्वी पार्लमेंटमध्ये काही प्रश्न विचारले अशी वार्ता ऐकली होती, ती खरी आहे काय? खरी असेल तर त्याविषयी सविस्तर वृत्तान्त कळव. श्रीगुरुगोविंदजी आणि रवींद्रनाथ यांच्यावरच्या कविता तुला मिळाल्या का?

नामदार गोखल्यांना मृत्यूने गाठले हे वाचून फार वाईट वाटले. एकंदरीत ते फार मोठे देशभक्त होते यात शंका नाही. प्रसंगी भांबावल्यामुळे कधी कधी त्यांच्या तोंडातून असे उद्‌गार निघून जात आणि हातून अशा गोष्टी होऊन जात की, काही महिन्यांनंतर त्यांविषयी त्यांची त्यांनाच लाज वाटे. पण त्याच वेळी त्यांचे सर्व जीवन मातृभूमीच्या सेवेला समर्पिलेले होते आणि स्वार्थमूलक किंवा व्यक्तिविषयक असे त्यांच्या वागण्यात फार थोडे असे हे आपण विसरता कामा नये. त्यांच्या कल्पनेप्रमाणे त्यांनी मातृभूमीच्या सेवेत आणि तिचे कल्याण करण्यात आयुष्य व्यतीत केले. मृत्यूने आमची नित्याची ताटातूट करण्यापूर्वी त्यांच्याशी भेट व्हावी आणि लंडनमध्ये पूर्वी त्यांनी म्हटल्याप्रमाणे आम्ही एकमेकांचे अनुभव ताडून पहावे अशी माझी फार इच्छा होती! काही गोष्टींत आमचे एकमत होईना तेव्हा ते म्हणाले, ''बरे सावरकर, आपण पुन्हा सहा वर्षांनी भेटू आणि एकमेकांचे अनुभव ताडून पाहू!'' महाराष्ट्राने त्यांच्या जागी त्यांच्याहूनही अधिक योग्यतेच्या व्यक्तीला विधिमंडळात पाठविले पाहिजे. त्यांनी जितके केले तितके जरी प्रत्येक हिंदुपुत्राला करता आले तर किती कार्य होईल!

पुढच्या पाळीला तू जेव्हा पुस्तके पाठवशील तेव्हा भारतगौरव-ग्रंथमालेची 'जन्मभूमी' आणि 'गौतम' ही पुस्तके अवश्य पाठव. ती. बाबांना ती वाचावयाची फार इच्छा आहे. फ्रान्सवरच्या जर्मनीच्या स्वारीमुळे मॅडम कामांकडची काहीही वार्ता कळणे अशक्य झाले असेल अशी मला भीती वाटत होती. मी येथे आल्यापासून त्या तुला दुसऱ्या आईच्या जागी झाल्या आहेत. आणि आयुष्यातला अत्यंत कष्टमय प्रसंगी त्यांनी नितांत मोठेपणाने आणि संबंधांना स्मरून आपल्याला साह्य केले! या जगद्‌व्यापी गोंधळातसुद्धा त्यांना तुझे स्मरण होते आणि त्या नियमितपणे तुला पत्र पाठवितात हे वाचून मला फार आनंद झाला. असल्या एका निष्ठावंत, उदारचरित, निर्भर आणि प्रेमळ हाताच्या स्पर्शाबरोबर प्रियतमांच्या औदासीन्याने, विश्वासस्थानांच्या विश्वासघाताने आणि आप्तांच्या अदर्शनाने उन्मळून टाकलेला मनुष्याच्या

अंतःकरणातील मनुष्यजातीविषयीचा विश्वास पुनः सुस्थिर होतो! त्या प्रेमाच्या जिवाला मला पत्र पाठवता येत नाही आणि त्यांच्या उदात्त चारित्र्याविषयी नि दीन आणि आर्त यांच्यासंबंधीच्या आस्थेविषयी मला किती आदर वाटतो आणि पुन्हा एकदा त्यांचे दर्शन व्हावे म्हणून मी किती उत्कंठित झालो आहे हे त्यांना सांगता येत नाही याचा मला खेद होतो! पण त्याला निरुपाय आहे. तेव्हा तूच आपल्या कोणाही आप्तांच्या आधी त्यांना माझे सादर प्रणाम पोचते कर. कारण आप्त आपल्याविषयी काही तरी करतात यात विशेष काय? त्या किती करतात आणि कसे करतात याचे आश्चर्य आहे!

तू पाठविलेली पुस्तके वाचीत असताना दिसून आले की, सर्व देशभर प्रकट होण्यासाठी धडपड करणाऱ्या नवचैतन्याच्या झोतामध्ये तेलगू प्रांतातील आपले देशबांधवही पूर्ण सापडले आहेत. आंध्रसभेची चळवळ प्रचंड आणि महत्त्वाची आहे. पण तो प्रांत तमिळांच्यापासून अलग करण्याची कल्पना कोती आहे. त्यातल्या त्यात ''आंध्रमाता की जय'' या घोषाने राष्ट्रीय जयजयकार करण्यात आला ही गोष्ट वाचून मला फार खेद झाला! क्षुद्र प्रांताभिमानाच्या वृत्तीचा तो स्वाभाविक परिपाक आहे! या गवताच्या काडीवरून, येणाऱ्या अशुभ वादळाच्या दिशेची कल्पना होते. स्वदेशीच्या भव्य चळवळीची ही एक रोगट प्रतिक्रिया आहे आणि वेळेवर त्यात सुधारणा झाली  पाहिजे. बंगालमधल्या फाळणीच्या लहान प्रश्नाभोवती चिकटलेल्या स्वदेशी चळवळीने ही प्रतिक्रिया उत्पन्न केली आहे! प्रत्येक प्रांताला आपण स्वतंत्र व्हावे असे वाटते आणि आपल्यापुरत्याच जयघोषाच्या व चिरायुत्वाच्या गर्जना तो करीत सुटतो! पण राष्ट्रदेह जगल्याशिवाय हे प्रांतांचे अवयव कसे जगणार! महाराष्ट्र, मद्रास, बंगाल हे सारे मोठे आहेत आणि चिरंजीवही होतील पण ते तिच्या संपूर्ण भारतमातेच्या द्वाराने. तेव्हा आपण 'आंध्रमाता की जय' असा जयघोष न करता 'भारतमाता की जय' असा केला पाहिजे आणि 'बंग आमार' असे राष्ट्रगीत न गाता 'हिंद आमार' असे राष्ट्रगीत गाइले पाहिजे! सर्व प्रांतांनी आणि तेथल्या लहान लहान भाषांनी भिन्न भिन्न होण्याची खटपट करण्यापेक्षा एकत्रित झाले पाहिजे आणि अद्याप असलेले प्रतिबंध व भाषाभिन्नत्वाचा गोंधळ यांना चिकटून न राहता ते नाहीसे किंवा दूर केले पाहिजेत! चिमुकली राष्ट्रे! बेल्जमचे उदाहरण सावध व्हावयाला अद्यापि पुरेसे नाही का झाले? इंग्रजांच्या राज्यामुळे त्यांच्या मनात नसतानाही जर एखादी कल्याणाची गोष्ट केली असेल तर ती ही आहे की, त्याने मातृभूमीतील अलग करणारे पंथ-भेद मुशीत वितळवून त्यांना एकरूप केले आणि घणाचे घाव घालून भिन्न प्रांतीयांचे एक जानपद घडविले! आता या महत्कार्याच्या सिद्धीच्या आड येणारी प्रत्येक गोष्ट दूर सारावयाचे सोडून आपण एका हाताने हे अभीष्ट साधण्यासाठी द्यावे लागलेले मूल्य म्हणून अडकवून घेतलेल्या शृंखला घट्ट धरून ठेवतो आहो आणि दुसऱ्या हाताने त्या अभीष्टाचे अनिष्टात रूपांतर करण्याची खटपट करतो आहो.

तुझ्या पत्रासंबंधी नि तू पाठविलेल्या पुस्तकांसंबंधी मला जे काही वाटत होते ते सर्व आता लिहून झाले असे मला वाटते. पुढच्या वेळी पत्रात साठविलेल्या तालिकेप्रमाणे पुस्तके पाठवावीत. सप्टेंबर पहिलीच्या आधी तुझे येणे होणार असेल तर बंगी न पाठविता तूच पुस्तके घेऊन ये. तोपर्यंत येणे होत नसेल तर बंगी पाठव. आपल्या अष्टमित्रांना इकडचा निरोप कळवावयाचा आणि परत पाठविण्यासाठी त्यांचा काही निरोप असला तर मागवावयाचा एवढ्यासाठी अवश्य तो पत्रव्यवहार आटोपताच या पत्राचे उत्तर पाठव. तू पत्रात लिहिलेल्या गृहस्थाच्या आणि तुझ्या भेटीचा योग आला हे मला ठाऊक होते. कारण ''हंसी हंस बकी बक मिसले, जन ओढतो स्वजातिकडे''. त्याला माझे अत्यंत प्रेमाचे वंदेमातरम सांग. मला त्याची वारंवार आठवण होते. आपल्या प्रिय प्राध्यापक महाराजांचे कसे काय चालले आहे? आता आणखी एक पाखरू जेथे तान्हेलेल्या हृदयाला तृषा शमवावयाला एक जलबिंदूही मिळत नाही आणि आशेच्या खुरटलेल्या पुष्पाला उमलविणारी दवकणिकाही आढळत नाही अशा जळत्या वाळवंटाच्या भयाण अरण्यातले उड्डाण पार पाडून त्या लहानग्या प्रिय घरट्यात पुनः परत आले असेल या कल्पनेने माझे हृदय आनंदाने उचंबळते आहे! त्याच्या सुटकेत आणि इतर मंडळींच्या सुटकेत माझीच अंशतः सुटका झाली आहे असे मला वाटते! बिचारा प्रिय सखाराम आज तेथे परत आला असता तर!- आपल्या कार्यासाठी देह अर्पून ज्याने स्वर्ग गाठला त्याने जगावयाला पाहिजे होते असे म्हणणे हे मूर्खपणाचे किंबहुना अपमानाचे आहे- तरी मन राहत नाही!

आता आमच्यासंबंधी. आमच्याविषयी तू मुळीसुद्धा काळजी करू नकोस हेच मला पुनः तुला सांगावयाचे आहे. आमच्या वेळच्या सर्व नियत वर्षांच्या बंद्यांना परत हिंदुस्थानात पाठविण्यात आले आहे; येथे केवळ आम्ही जन्मठेपवाले राहिलो आहो. युद्ध चालू असेपर्यंत काही म्हणावयाचे नाही आणि येथल्या अधिकारीवर्गाला अडचणीत पाडावयाचे नाही असे तत्त्व मी मनाशी ठरविले आहे. सध्या आमची दोघांचीही प्रकृती चांगली आहे. आणि सध्या कॅप्टन मेजर मरे हे कारागृहाची व्यवस्था पाहतात. ते येथे आहेत तोपर्यंत मनाला बोचेल असे काही केले जाणार नाही किंवा ऐकावे लागणार नाही हे निश्चित. सरळ नियमांचे परिपालन होईल, आतून त्रास द्यावयाचे क्षुद्र प्रयत्न होणार नाहीत. तू पाठविलेले प्रत्येक पत्र आणि पुस्तक आम्हाला व्यवस्थित मिळेल. आमच्या दिनक्रमासंबंधाने सांगावयाचे म्हणजे तो मागच्या वर्षाप्रमाणेच त्याच ठराविक मार्गाने चालला आहे. कारागृहात पहिल्या दिवशी जे घडते तेच नित्य- त्याच्यापेक्षा वाईट घडले नाही तर- घडत असते. सर्व नावीन्य, सर्व फेरपालट नाहीसे करावयाचे हेच येथल्या नियमनांचे वास्तविक सार असावे असे दिसते! पदार्थसंग्रहालयातील निरनिराळ्या प्रकारच्या आणि चमत्काराच्या वस्तूंप्रमाणे आमच्यातील प्रत्येकजण त्याच जागी आणि त्याच स्थितीत कप्प्यात ठेवलेला आणि वरती अंकाची पत्रिका लावलेला, फार तर थोड्याफार धुळीने माखलेला असा, आढळावयाचा. तेव्हा गेल्या वर्षाच्या पत्रात जे मी दिनचर्यापत्रक दिले होते तेच तुला मी येथे

असेपर्यंत आमच्या जीवनक्रमाची दिनचर्या म्हणून उपयोगी पडेल! आम्ही लवकर उठतो, उरफोड काम करतो- नियमित जेवतो - अगदी त्याच वेळी, त्याच स्थळी आणि त्याच कारागृही कौशल्याने नि आरोग्यविषयक काळजीने तयार केलेले, तितकेच आणि तसलेच अन्न जेवतो. काम आटोपून मिळालेल्या मोकळ्या वेळी मी बरेच वाचन करतो आणि कधी कधी संध्याकाळी विविध पुष्पांना- आता त्यांची केवळ नावांनीच आठवण करावी लागते- आणि पुष्पसदृश प्रसंगांना निर्यमक कवितेत गुंफून मग निजतो. येथे एक गोष्ट सांगितली पाहिजे. आपल्याला पाहिजे ते प्रत्यक्ष बोलण्याला किंवा करण्याला बंदीवानांना कडक निषेध असला तरी कारागृहातल्या अधिकाऱ्यांच्या वतीने हे मान्य करणे प्राप्त आहे की प्रत्येक बंद्याला मन मानेल त्याप्रमाणे स्वप्नात रमण्याची मनसोक्त अनुमती आहे! आणि या अनुमतीचा मी शक्य तितका लाभ घेतो हे तुला सांगावयाला नकोच! बहुधा प्रत्येक रात्री मी कारागृहाची बंधने तोडतो आणि दऱ्यांतून व खोऱ्यांतून तसेच नगरांवरून व शिखरांवरून तुमच्यातील कोणी तरी- जो केव्हा तरी आणि कोठेतरी माझ्या हृदयाशी निगडित झाला आहे असा कोणी तरी- भेटेपर्यंत भ्रमण करीत असतो! मी प्रतिरात्री हे करतो पण माझे बंदीगृहातील कनवाळू अधिकारी तिकडे दुर्लक्ष करतात! तुम्ही जागे मात्र बंदीशाळेच्या भिंतीच्या आत झाले पाहिजे एवढेच त्यांचे म्हणणे!

युद्ध संपताच आमच्या मुक्ततेसाठी एक सार्वजनिक अर्ज पाठविण्याची व्यवस्था व्हावी. त्याचे कारण असे आहे. हिंदुस्थानातच काय पण दुसऱ्या कोणत्याही स्वयंशासित आणि स्वतंत्र देशातसुद्धा जनतेची तशी इच्छा पाठीशी प्रेरणा करावयास असल्यावाचून कोणत्याही सरकारला राजकीय बंदींची मुक्तता करता येत नाही! लोकांना आपल्या शिक्षा भोगीत असलेल्या बंद्यांनी परत आपल्यात यावे अशी इच्छा असल्यावाचून राजाला किंवा अध्यक्षाला आपला क्षमेचा अधिकार उपयोगात आणता येत नाही! जर हिंदी बांधवांची तशी इच्छा असेल आणि युद्धाच्या शेवटी त्याप्रमाणे अर्ज जाईल तर आमची मुक्तता होईलही आणि जर हिंदी बांधवांना आम्ही परत यावयाला नको असेल तर सरकारलाही आम्हाला सोडता येणार नाही आणि त्या सुटण्यात अर्थही नाही. पोर्टब्लेअर आम्हाला ठेवावयाला सिद्ध आहे आमि मी येथे आहेही! आम्ही ज्यांना नको आहो अशा लोकांकडे आगंतुकी करावयाची आमची मुळीच इच्छा नाही. तसे असेल तर आम्हाला इतर बंद्यांप्रमाणे कारागृहाच्या बाहेर राहू देण्याविषयी विचारणा कर म्हणजे झाले! येथे आल्यावर ज्यांना नवीन अपराधाकरिता पुनः शिक्षा झाली आहे अशांनाही कारागृहाच्या बाहेर बेटात वस्ती करून राहण्याची आणि आपली माणसे आणण्याची मोकळीक आहे. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, येथे लागू असलेल्या नियमाप्रमाणे बंद्यास मिळाल्या पाहिजेत तेवढ्या सर्व मागण्या मागावयाच्या; आपण दयेची याचना करीत नाही. आणि तू तेथून आणि आम्ही येथून नेहमी टोचणी करीत राहिले तर एवढे होण्याचा संभव आहे.

गेल्या वर्षाच्या ती. प्रियतम वहिनींच्या पत्रात त्यांनी त्यांच्या लहानग्या धोंडीबद्दल काही लिहिले नाही. तिचे लग्न झाले ना?- प्रियतम यमुनेला माझे उत्कट प्रेम पोचव- तिची प्रकृती कशी काय आहे? तिचे वाचन चालले आहे ना? प्रिय बळवंतराव कोणत्या विद्यालयात आणि कोणत्या वर्गात आहेत; तसेच दुसऱ्या मुलांची काय वार्ता आहे? माझ्या परम प्रिय व पूज्य वडील भावजयीच्या चरणी माझे पवित्र प्रेम आणि भक्ती अर्पण कर. तिचे चरित्र म्हणजे आत्यंतिक स्वार्थत्याग, उदात्त सहनशक्ती आणि स्वतःच्या अपराधाकरिता नव्हे तर दुसऱ्यांच्या कल्याणाकरिता शांततेने नि उच्चार न करता दुःख भोगण्याची सिद्धता, यांची अंतिम सीमा आहे! आणि धाकट्या वहिनींनाही माझे आशीर्वाद सांग; मागच्या वर्षी माईच्या पत्रात त्यांनी प्रेमाने काढलेली माझी आठवण मला पोचली. त्यांची आणि इतर सर्व प्रेमळ स्नेह्यांची मला नित्य आठवण येते. माझे मन आपल्या निर्हेतुक भ्रमंतीवर निघाल्यानंतर प्रत्येक वळणावर त्यांच्या प्रेमळ मूर्तीचे दर्शन घडतेच; आणि मग माझे मन लागलीच थांबते आमि ज्यांच्या योगाने माझे जीवन असे फुलले त्यांच्यासाठीच आर्त अश्रुबिंदूचे नूतन आणि  मनोहर मंदिर उभारते, त्यांची त्यात काही वेळ प्रस्थापना करते, त्यांची पूजा रचते आणि त्यांनी मला विसरू नये म्हणून त्यांची प्रार्थना करते! एक क्षणभर का होईना ज्यांनी माझ्यावर प्रेम केले आणि मला प्रेम करण्याचा अधिकार दिला त्यांचे माझ्या जिवाच्या जिवलगांचे, हृदयाच्यां सुहृदांचे, साहसातील सहकाऱ्यांचे आणि खेळगड्यांचे- त्याच मंदिरात आणि त्याच प्रभावळीत मी पूजन करतो!!

माझ्या लाडक्या बाळा, तुझा वैद्यकशास्त्राचा अभ्यास लवकरच फलद्रूप होणार याविषयी मला आनंद वाटतो. अभ्यासाकरता प्रकृती बिघडवून घेऊ नकोस. तुझे वजन मला कळवीत जा. आता माझ्या लाडक्या बाळा, तुला, आपल्या माईला आणि चिरंजीव वसंताला माझे प्रेम आणि उत्तमोत्तम आशीर्वाद दिल्यानंतर या मनोमय मिठीतून मला सोडवून तुझा निरोप घेऊ देशील का?

तुझाच भाऊ

तात्या.

पत्र चौथे

ॐ ।।

श्री राम ।।

पोर्टब्लेअर, एकलकोंडी

दिनांक ६-७-१९१६

प्रिय बाळ आणि गोड शांते-

आयुष्याच्या दुसऱ्या अवस्थेत- वैवाहिक प्रेमाच्या जीवनात- तुम्ही केलेल्या पदार्पणाप्रीत्यर्थ मी आणि ती. बाबा-आम्ही-तुमचे अत्यंत मनापासून अभिनंदन करतो. बाळ, आयुष्यातील पहिली अवस्था - ज्ञानार्जनाचा आणि शीलसंपादनाचा तो स्वार्थरहित काळ - तू योग्य रीतीने पार पाडला आहेस. संस्कृत आणि इंग्रजी या भाषांशी झालेल्या परिचयामुळे आधुनिक आणि पुरातन अशा दोन्हीही ज्ञानभांडारांच्या द्वारांच्या सोनेरी किल्ल्या तुझ्या हातात आल्या आहेत. वैद्यकाची तू उत्तीर्ण केलेली अंतिम परीक्षा जगाच्या कोणत्याही भागात तू असलास तरी आणि अनुदार नि अपमार्गी विधिमंडळाने काहीही नियम केले तरी, तुला हात दिल्यावातून राहणार नाही. तुझ्या लेखणीने काव्य आणि गद्य या दोन्ही वाङ्मयक्षेत्रांत आपले सामर्थ्य महाराष्ट्राला दाखविले आहे. उलटपक्षी त्या अवस्थेतील कर्तव्य आणि भार यापेक्षा अधिक चांगल्या रीतीने पार पाडणे शक्य नव्हते. आपल्या मातृभूमीवर वादळ उठले, पण त्यातही तू आपल्या नेमलेल्या स्थली निश्चल आणि रोखून उभा राहिलास; त्याने उत्पात मांडला पण भोवतालच्या विश्वासघात्यांच्या घोळक्यात तुला एकाकी पण निष्ठावंत आणि निर्भय असेच राखून त्याला निघून जावे लागले! जो उत्साह आपल्या तरुण मंडळीत उत्पन्न करण्याकरता युरोपीय राष्ट्रांना त्यांच्या डोळ्यांसमोर आयर्न क्रॉस किंवा व्हिक्टोरिया क्रॉस यांचे आमिष धरावे लागते किंवा सन्मानपटाच्या तालिका उघडाव्या लागतात तो उत्साह आणि ती एकनिष्ठा, लोकांनी आपल्याविषयी प्रसंगोद्गार काढावे याची देखील क्षिती न बाळगता तू दाखविलीस. तेव्हा बाळ, तू आपली जीवनाची प्रथमावस्था उदात्तपणे घालवली आहेस. आणि आता तुम्ही- प्रिय बाळ आणि लाडक्या शांते - आयुष्याच्या उच्चतम आणि सुखमय द्वितीयावस्थेत - वैवाहिक प्रेमाच्या जीवनात – पदक्षेप करीत आहा. प्रिय बाळ, तुझ्या मार्गावर गुलाबांचे थर रचले जावोत आणि लाडक्या शांते, तुझ्या तारुण्याला सुवर्णाचा आणि स्वर्गसुमनांचा बहर येवो! मनुष्याच्या अधःपतनानंतर त्याच्यापाशी उरलेल्या एकमेव स्वर्गीय सौख्याची - कौटुंबिक स्वास्थ्याची -

